**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन विभागातील अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय अधिकारांत सुधारणा करण्याबाबत व वन विकास महामंडळ (Forest Development Corporation of Maharashtra Ltd.) मधील सक्षम अधिकाऱ्यांना तांत्रिक मंजूरी व प्रशासकीय मान्यता विषयक अधिकार प्रदान करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन निर्णय क्र. : मग्रारो-२०१६ / प्र.क्र. १०२ / मग्रारो-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०१८

वाचा :-

१) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१० / प्र. क्र. ४७ / रोहयो-१०, दिनांक ८ जून, २०१०
२) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१० / प्र. क्र.४७ / रोहयो-१०, दिनांक ३ ऑगस्ट, २०११.
३) शासन निर्णय क्र. मग्रारोहयो-२०१२ / प्र. क्र. ४ / पुनर्बांधणी -३ / रोहयो-१, दिनांक २७ सप्टेंबर, २०१२
४) शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०१६ /प्र.क्र. ३९/रोहयो -७ दिनांक ४ ऑगस्ट, २०१६,
५) केंद्र शासनाचे मास्टर सर्क्यूलर (२०१६-२०१७), दिनांक ०१ एप्रिल, २०१६
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९ सप्टेंबर, २०१६
७) वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीसी-२०१७/रोहयो/प्र.क्र.०५/फ-५, दिनांक-१८ एप्रिल, २०१८

प्रस्तावना :-

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत मोठ्या प्रमाणात कामे घेण्याचे प्रस्तावित आहे. महसूल यंत्रणेकडे असलेला कामाचा व्याप पाहता, वन विभागामार्फत करण्यात येणाऱ्या कामांच्या अनुषंगाने, त्या यंत्रणेकडे अधिक व्यापक प्रमाणात तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेचे अधिकार उपरोक्त संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आले होते. सदर शासन निर्णयान्वये वन विभागातील अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अधिकारांत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तसेच, वन विभागातील अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या धर्तीवर रोपवनांची कामे जलदगतीने पार पाडण्यासाठी एम-नरेगा आणि मग्रारोहयो अंतर्गत घेण्यात येणाऱ्या रोपवाटीका, रोपवन व मृद जलसंधारण इ. कामांतर्गत हजेरीपत्रके देणे (Issue of Muster Roll) , पारित करणे (Grant Approval on the lines of powers given to Tahsaildar), आणि कुशल/ अकुशल बाबींचे भुगतान करण्याचे आर्थिक अधिकार, वन विकास महामंडळ म्हणजेच एफडीसीएम लि. (Forest Development Corporation of Maharashtra Ltd.)

मधील सक्षम अधिकाऱ्यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन खालील निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वन विभागातील अधिकाऱ्यांना वन विभागामार्फत करण्यात येणाऱ्या वनीकरण व रोपवाटिकांच्या कामांसंबंधित तांत्रिक व प्रशासकीय मंजूरीच्या आर्थिक मर्यादा दिनांक २९ सप्टेंबर, २०१६ अन्वये प्रदान करण्यात आल्या होत्या. त्यामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत. तसेच, वन विकास महामंडळ (Forest Development Corporation of Maharashtra Ltd.) मधील सक्षम अधिकाऱ्यांना वन विभागामार्फत करण्यात येणाऱ्या वनीकरण व रोपवाटिकांच्या कामांसंबंधित पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे तांत्रिक व प्रशासकीय मंजुरीच्या आर्थिक मर्यादा पुढीलप्रमाणे प्रदान करण्यात येत आहेत.

| **अ. क्र.** | **सक्षम अधिकारी** | **एफडीसीएम लि. मधील समकक्ष अधिकाऱ्यांचे पदनाम** | **तांत्रिक मंजूरीची मर्यादा (रूपये लक्ष)** | **प्रशासकीय मान्यता मर्यादा (रूपये लक्ष)** |
|---|---|---|---|---|
| १. | वनक्षेत्रपाल / लागवड अधिकारी | वनपरिक्षेत्र अधिकारी एफडीसीएम लि. | २५.०० | -- |
| २. | सहाय्यक वनसंरक्षक / सहाय्यक संचालक, सामाजिक वनीकरण | सहाय्यक व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ५०.०० | -- |
| ३. | उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उप विभागीय वन अधिकारी (स्वतंत्र प्रभार) उप संचालक, सामाजिक वनीकरण | विभागीय व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ७५.०० | १०.०० पर्यंत |
| ४. | जिल्हाधिकारी | | -- | १०.०० ते २५.०० |
| ५. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) व (वन्यजीव) / मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण | प्रादेशिक व्यवस्थापक/ महाव्यवस्थापक (प्रादेशिक)/मुख्य व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ७५.०० पेक्षा अधिक | -- |
| ६. | विभागीय आयुक्त | | -- | २५.०० ते ७५.०० |
| ७. | सचिव (रोजगार हमी योजना) | | -- | ७५.०० पेक्षा अधिक |

२. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन विभागामार्फत करण्यात येणारी मृद - जलसंधारणाची कामे जसे सलग समपातळी चर, जलशोषक चर, दगडी नाला बांध, गॅबियन बंधारे इ. कामांसाठी प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमध्ये देखील पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत. तसेच, एफडीसीएम लि. (Forest Development Corporation of Maharashtra Ltd.) मधील अधिकाऱ्यांना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन विभागामार्फत करण्यात येणारी मृद - जलसंधारणाची कामे जसे सलग समपातळी चर, जलशोषक चर, दगडी नाला बांध, गॅबियन बंधारे इ. कामांसाठी पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेची आर्थिक मर्यादा पुढीलप्रमाणे प्रदान करण्यात येत आहेत.

| **अ. क्र.** | **सक्षम अधिकारी** | **एफडीसीएम लि. मधील समकक्ष अधिकाऱ्यांचे पदनाम** | **तांत्रिक मंजूरीची मर्यादा (रूपये लक्ष)** | **प्रशासकीय मान्यता मर्यादा (रूपये लक्ष)** |
|---|---|---|---|---|
| १. | वनक्षेत्रपाल / लागवड अधिकारी | वनपरिक्षेत्र अधिकारी एफडीसीएम लि. | २५.०० | -- |
| २. | सहाय्यक वनसंरक्षक / सहाय्यक संचालक, सामाजिक वनीकरण | सहाय्यक व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ५०.०० | -- |
| ३. | उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उप विभागीय वन अधिकारी (स्वतंत्र प्रभार) उप संचालक, सामाजिक वनीकरण | विभागीय व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ७५.०० | १०.०० पर्यंत |
| ४. | जिल्हाधिकारी | | -- | १०.०० ते २५.०० |
| ५. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) व (वन्यजीव) / मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण | प्रादेशिक व्यवस्थापक/ महाव्यवस्थापक (प्रादेशिक)/मुख्य व्यवस्थापक एफडीसीएम लि. | ७५.०० पेक्षा अधिक | -- |
| ६. | विभागीय आयुक्त | | -- | २५.०० ते ७५.०० |
| ७. | सचिव (रोजगार हमी योजना) | | -- | ७५.०० पेक्षा अधिक |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१८२७५७७११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Babanrao Ghadge

Digitally signed by Prakash Babanrao Ghadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f90259e87b0960801edc01f52214ff1b58c7e3c653fb93bef856fb92941b9d7, serialNumber=77e1eba3aec9a0675410db6fa1a645387767189322f02b94733def91397c59a0, cn=Prakash Babanrao Ghadge
Date: 2018.10.15 15:46:26 +05'30'

**( प्र. ब. घाडगे )**
**कार्यासन अधिकारी, नियोजन (रोहयो) विभाग**

**प्रत -**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
५) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त
९) आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर
१०) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६) प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
१८) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१९) सर्व मुख्य वनसंरक्षक
२०) सर्व उपवनसंरक्षक
२१) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
२२) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
२३) सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, नियोजन (रोहयो) / वन विभाग
२४) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
२५) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२६) निवड नस्ती (मग्रारो-१).